शालेय स्तरावर पर्यावरण सेवा योजना
राबविण्यासाठी निधी मुक्त करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पर्यावरण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१४/प्र क्र ९३/तां.क.१

नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १९ जानेवारी,२०१९.

वाचा -

**१. या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः इएनव्ही-२०१०/प्र क्र ८/तां.क.३, दिनांक १४ जानेवारी,२०११,दिनांक २४ जून,२०११, व दिनांक २७ मार्च, २०१२.**
**२. या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः इएनव्ही-२०१४/प्रक्र९३/तां.क.१, दिनांक १२ सप्टेंबर,२०१८.**
**३. कार्यक्रम संचालक, पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे यांचे पत्र क्रमांक-सीईई/केंद्र/ईएसएस-८६६८६६/२०१८-१९,Date-१० डिसेंबर,२०१८.**

प्रस्तावना -

"पर्यावरण सेवा योजना"[Environment Service Scheme (ESS)] ही सन २०११ पासून सुरु करण्यात आली. सदर योजनेची पर्यावरण विभागाच्या वतीने राज्यस्तरावर अंमलबजावणी केंद्रिय पर्यावरण, वने व वातावरणीय बदल मंत्रालयामार्फत "सेंटर ऑफ एक्सलन्स" म्हणून घोषित "पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे" (Centre for Environment Education (CEE), Pune) यांचे मार्फत करण्यात येत आहे. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपरोक्त कार्यक्रम राबविण्यासाठी पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे यांच्याकडून दिनांक २६ ऑगस्ट,२०१८ रोजी प्राप्त अंदाजपत्रकाच्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक २ अन्वये रुपये ८८,५७,९३६/- इतका निधी मंजूर करण्यात आलेला असून, रु.५०,००,०००/- पहिला हप्ता म्हणून वितरित करण्यात आला आहे. आता उर्वरित रक्कमेचा रु. ३८,५७,९३६/- दुसरा हप्ता वितरित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

शालेय स्तरावर पर्यावरण कार्यक्रम राबविण्यासाठी "पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे" यांना त्यांच्याकडून प्रस्तावित केलेल्या अंदाजपत्रकानुसार पर्यावरण सेवा योजना राज्यातील ५० शाळांमध्ये राबविण्यासाठी रु.८८,५७,९३६/- (एकूण रुपये अठ्ठयाऐंशी लाख सत्तावन हजार नऊशे छत्तीस फक्त) एवढी रक्कम मंजूर करण्यास व सदर रक्कमेपैकी पहिला हप्ता रु.५०,००,०००/- दिल्यानंतर उर्वरित रु.३८,५७,९३६/-रक्कमेचा दुसरा हप्ता मुक्त करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त मुक्त करण्यात आलेली रक्कम ही शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१०/प्र.क्र ८/ तां.क.३,दिनांक १४ जानेवारी, २०११ मध्ये नमूद सर्व अटींच्या अधिन राहून करण्यात येतआहे. हे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करावे. योजनेंतर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा केलेली वा मान्य केलेली रक्कम त्याच कामासाठी राज्य शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्तीप्रमाणे व विहित कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च

करणे आवश्यक आहे, ही रक्कम इतर दुसऱ्या कोणत्याही कामासाठी वापरता येणार नाही किंवा वळती करता येत नाही.

३. पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे यांनी प्रत्येक आर्थिक वर्षाचे उपयोगिता प्रमाणपत्र वर्ष संपल्यानंतर एप्रिलच्या १५ तारखेपर्यंत पर्यावरण विभागास सादर करावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी बँकेतील वा खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणाऱ्या पासबुकाची साक्षांकित प्रत सोबत जोडण्यात यावी. सहायक अनुदानामधून करण्यात येणाऱ्या खर्चाच्या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावे व त्याचे लेखापरिक्षण करण्यात यावे व त्याचा अहवाल पर्यावरण विभागास पाठविण्यात यावा.

१. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून "पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे" यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीमती शिल्पा शिर्के, कक्ष अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. सु.कि.निकम, उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी "पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे" (Centre for Environment Education, Pune)यांना रु. ३८,५७,९३६/-(एकूण रुपये अडतीस लक्ष सत्तावन्न हजार नऊशे छत्तीस फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाद्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. यु-४,३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना(०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (१३) पर्यावरण विषयक जनजागृती, शिक्षण व वातावरण बदल कृती योजना (३४३५ १३०२) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपरोक्त कार्यक्रमासाठी एकूण रु.३००.०० लक्ष एवढी तरतूद मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र क्र ६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद क्र.६ (क) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/प्र क्र ६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ मधील परि. क्र. ७ ते ९ मधील सर्व अटींची पूर्तता होत आहे.

४. याशिवाय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक अर्थसं २०१८/प्र क्र ६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ अन्वये खालील बाबींची पूर्तता होत आहे.

१) योजनेस प्रशासकीय मान्यता प्राप्त आहे.
२) "पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे" (Centre for Environment Education. Pune) यांना दुसरा हप्ता रु.३८,५७,९३६/- (एकूण रुपये अडतीस लक्ष सत्तावन्न हजार नऊशे छत्तीस) इतका निधी मुक्त करण्यास प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

३) यापूर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केलेले आहे. तसेच मागील तीन महिन्यात कोणाताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही.

४) मागणी क्रमांक-क्र.यु-४,३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२)(१३) पर्यावरण विषयक जनजागृती, शिक्षण व वातावरण बदल कृती योजना (३४३५ १३०२) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) तसेच परिच्छेदातील ४,५,६,७,८,१० या बाबी लागू नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२४१५२०१८०००४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shilpa Chandrashekhar Shirke

Digitally signed by Shilpa Chandrashekhar Shirke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21b5a39b05a9599cbf12d283890a954dbc03dacea20beb3547439b161f0d9ca7, cn=Shilpa Chandrashekhar Shirke
Date: 2019.01.24 15:30:39 +05'30'

**( शिल्पा शिर्के )**

कक्ष अधिकारी, पर्यावरण विभाग महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. राज्यमंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय मुंबई-३२.
४. कार्यक्रम संचालक, पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे
५. महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
८. निवासी लेखा अधिकारी,मुंबई.
९. वित्त विभाग, कार्यासन (व्यय-१६),मंत्रालय मुंबई-३२.
१०.पर्यावरण विभागातील सर्व कार्यासने,
११.रोख शाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. ( ३ प्रती)
१२.निवड नस्ती (तां.क.१)